**ई-कुबेर (e-Kuber) प्रणालीमार्फत आहरण व संवितरण अधिकारी यांच्या बँक खात्यात थेट रकमा जमा करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- संकीर्ण २०२०/प्र.क्र.६/२०/कोषा प्रशा-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
तारीख : ११ मार्च, २०२०.

वाचा:- १. वित्त विभाग शासन निर्णय क्र.डीडीओ-१००७/प्र.क्र.६२/कोषा प्र-५,दि.०७ एप्रिल २००८
२. वित्त विभाग शासन निर्णय क्र.संकिर्ण-१०१०/प्र.क्र.६८/कोषा प्र-५,दि.२३ डिसेंबर २०१०
३. वित्त विभाग शासन निर्णय क्र.संकिर्ण-१०१०/प्र.क्र.६८/कोषा प्र-५,दि.२२ जानेवारी २०१३

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयाव्दारे आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी अधिदान व लेखा कार्यालय व कोषागार कार्यालयात सादर केलेल्या सर्व देयकांचे प्रदान ईसीएस व एनईएफटी या इलेक्ट्रॉनिक तंत्राचा वापर करुन भारतीय रिझर्व्ह बँकेच्या / सार्वजनिक क्षेत्रातील मान्यताप्राप्त बँकांच्या सहाय्याने करण्याबाबत दिलेल्या निर्देशानुसार कार्यवाही करण्यात येत आहे.

तसेच संदर्भ क्र. ३ च्या शासन निर्णयाव्दारे अधिदान व लेखा कार्यालय,मुंबई; जिल्हा कोषागार कार्यालय, नागपूर व मराठवाडयातील काही कोषागारे वगळता राज्यातील सर्व कोषागारे / उपकोषागारे यांच्यामार्फत होणारी सर्व प्रदाने आहरण व संवितरण अधिकारी, पुरवठादार, कंत्राटदार व अनुदान प्राप्त संस्था यांच्या खात्यात थेट भारतीय स्टेट बॅक यांनी पुरविलेल्या सीएमपी (कॅश मॅनेजमेंट प्रोजेक्ट) या सुविधेद्वारे करण्यात येत आहे.

राज्य शासनाची संगणकीय प्रणाली भारतीय रिझर्व्ह बँकेच्या ई-कुबेर प्रणालीसोबत संलग्न करण्याबाबत भारतीय रिझर्व्ह बँक व मा.महालेखापाल सातत्याने आग्रही आहेत. त्या अनुषंगाने अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई व कोषागार कार्यालय, नागपूर यांचेकडून आहरण व संवितरण अधिकारी यांना होणारी सर्व प्रदाने भारतीय रिझर्व्ह बँकेने विकसित केलेल्या ई-कुबेर या आज्ञावलीव्दारे करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता

**शासन निर्णय:-**

केंद्रशासन, राज्यशासन व सार्वजनिक बँकांचे जमा व प्रदान व्यवहाराकरीता ‘ई-कुबेर’ही सर्वसमावेक्षक व एकसमान संगणक प्रणाली (युनिफॉर्म प्लॅटफॉर्म) भारतीय रिझर्व्ह बँकेने विकसित केली आहे. ही प्रणाली राज्यशासनाच्या ‘ट्रेझरीनेट” संगणकीय प्रणालीसोबत संलग्न करून यापुढे अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई व नागपूर कोषागार येथील प्रदाने ई-कुबेर या प्रणालीमार्फत करण्यात येतील.

अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई व कोषागार कार्यालय, नागपूर यांचेकडून होणारी सर्व प्रकारची प्रदाने आहरण व संवितरण अधिकारी यांच्या थेट बँक खात्यात तसेच निवृत्तीवेतन धारकांचे प्रथम प्रदान व मृत्यु- नि-सेवा निवृत्ती उपदान यांची प्रदाने त्यांच्या संबंधित बँक खात्यात ई- कुबेर प्रणालीव्दारे जमा होतील. तथापि मासिक निवृत्तीवेतन प्रदाने, सेवार्थ प्रणालीव्दारे तयार होणाऱ्या देयकांची प्रदाने व त्रयस्थ अदाता यांना ई-कुबेर प्रणालीव्दारे करावयाची प्रदाने याबाबतचा निर्णय यथावकाश घेण्यात येईल.

ई-कुबेर प्रदान प्रणाली अंमलबजावणी करण्याबाबत सविस्तर कार्यपध्दती व सूचना सोबतच्या जोडपत्रामध्ये विषद करण्यात आल्या आहेत.

ई-कुबेर प्रदान प्रणाली अंमलबजावणीच्या दृष्टीने अधिदान व लेखा कार्यालय, मुंबईकरीता सहाय्यक अधिदान व लेखा अधिकारी/लेखा अधिकारी, संगणक शाखा तसेच कोषागार कार्यालय, नागपूरकरीता अप्पर कोषागार अधिकारी हे समन्वय अधिकारी म्हणून काम पाहतील. ई-कुबेर द्वारे प्रदान करण्यासाठी राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र, पुणे यांनी (NIC) विकसित केलेल्या सुधारित कार्यप्रणालीचे प्रशिक्षण सर्व वापरकर्ते व आहरण व संवितरण अधिकारी यांना देणे आवश्यक राहील. प्रशिक्षणाबाबतची कार्यवाही मुंबई करिता अधिदान व लेखा अधिकारी व नागपूर करिता कोषागार अधिकारी हे पार पाडतील.

अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई व कोषागार कार्यालय, नागपूर या दोन्ही कार्यालयातून होणा-या सर्व प्रदानांचा व्यवहार शासनाच्या वतीने भारतीय रिझर्व्ह बँकेमार्फत होत असल्याने, सदर ई-कुबेर प्रदान प्रणाली केवळ या दोन ठिकाणापूरतीच मर्यादित राहिल.

ई-कुबेर प्रदान प्रणालीची अंमलबजावणी करताना काही कार्यात्मक अडचणी उद्भवल्यास त्याचे निराकरण करण्याच्या दृष्टिने संचालक, लेखा व कोषागारे हे वेळोवेळी उचित आदेश निर्गमित करतील. तसेच कोणत्याही अपरिहार्य अशा तांत्रिक कारणामुळे ई-कुबेर प्रदान प्रणालीमार्फत प्रदाने करण्यास अडथळा निर्माण झाल्यास सद्या प्रचलित असलेल्या पध्दतीचा वापर करुन प्रदाने करण्याबाबत स्थानिक स्तरावर निर्णय घेण्याचे अधिकार यथास्थिती अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई/कोषागार अधिकारी,नागपूर यांना राहतील.

नागपूर कोषागार कार्यालयात ई-कुबेर प्रणालीची अंमलबजावणी १ एप्रिल,२०२० पासून करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००३१११७२५५२२८०५ असा आहे.हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

INDRAJEET SAMBHAJI GORE

Digitally signed by INDRAJEET SAMBHAJI GORE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=6015944fe7d58a83f4a54c43147b5da1e34861e2984e9f793b66f7249aaa9c1a, postalCode=400032, street=Y-5/66,GOVERNMENT COLONY,MUMBAI, serialNumber=d4994742192306fcc1dea9aadd3810639506519fa652b919767b98b04e905a18, ou=FINANCE DEPUTY SECRETARY, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=INDRAJEET SAMBHAJI GORE
Date: 2020.03.11 17:27:57 +05'30'

**( इंद्रजित गोरे )**

**शासनाचे उपसचिव**

**प्रत,**

१.मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.

२.सर्व सन्मानिय विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य,

३.राज्यपालांचे सचिव

४.मुख्यमंत्र्यांचे सचिव

५. उप मुख्यमंत्र्यांचे सचिव

६.सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव

७.सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग

८.मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख.

९.प्रबंधक, मुळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई

१०.प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)- १, महाराष्ट्र, मुंबई

११.प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई

१२.महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर

१३.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर

१४.आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई ४००००२

१५.आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन, नागपूर ४४४००१

१६.प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई

१७.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई

१८.सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई

१९.प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई

२०.प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई

२१.मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई

२२.विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली

२३.सर्व विभागीय आयुक्त

२४.सर्व जिल्हाधिकारी

२५.सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी

२६.संचालक , लेखा व कोषागारे, मुंबई

२७.अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई

२८.सहसंचालक,लेखा व कोषागारे,कोकण/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/ अमरावती

२९.संचालक, स्थानिक निधी लेखापरिक्षा, कोकण भवन, नवी मुंबई

३०.सहसंचालक,स्थानिक निधी लेखापरिक्षा मुंबई /पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती

३१.वित्त विभागातील सर्व कार्यासने

३२.निवड नस्ती कोषा प्र.५

**(शासन निर्णय क्र.संकिर्ण २०२०/प्र.क्र.६/२०/कोषा प्रशा-५, दिनांक ११ मार्च,२०२० सोबतचे जोडपत्र)**

**ई-कुबेर प्रदान प्रणाली कार्यपध्दती**

१. 'बीम्स' प्रणालीत आहरण व संवितरण अधिकारी यांनी 'Add Payee' या मेनूमध्ये 'नोंदणीकृत आदाता' (रजिस्टर्ड पेयी ) नोंदविण्याची कार्यवाही करावी. बॅक खातेक्रमांकासह इतर सर्व तपशिल अचूक नोंद होईल हे पहावे. तद्नंतर अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई / कोषागार कार्यालय, नागपूर हे आहरण व संवितरण अधिकारी यांचेकडून रद्द धनादेशासहित प्राप्त झालेल्या आवेदनातील तपशील तपासून बीम्स प्रणालीवर नोंदणीकृत आदाता मंजुर करतील. कोषागाराने मंजूर केलेल्या प्रकरणांचे अदाता नोंदणी प्रमाणपत्र (पेयी रजिस्ट्रेशन सर्टिफिकेट) Reports या मेनूमध्ये 'Registrered Payee' या पर्यायांअंतर्गत उपलब्ध होईल.

२. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी कोषागारातील देयक स्वीकृती खिडकीवर सादर केलेले देयक, 'स्क्रोल ऑपरेटर' ई-कुबेर यांनी प्रचलित कार्यपध्दतीनुसार 'ट्रेझरीनेट' प्रणालीतील Bar Code e-Scroll Entry या मेनूचा वापर करुन स्वीकारावे. तथापि आहरण व संवितरण अधिकारी यांनी अशी देयके बील पोर्टल प्रणालीतून तयार केलेली असणे अनिवार्य राहील.

३. स्वीकृत केलेली देयके प्रचलित कार्यपध्दतीनुसार संबंधित लेखापरिक्षण शाखांमध्ये पाठविण्यात यावीत. लेखापरिक्षण शाखेत पारीत झालेल्या ज्या देयकांचे प्रदान ई-कुबेर आज्ञावलीद्वारे करावयाचे आहे अशा देयकांकरीता प्रदानाच्या ECS/**Electronic**/Cheque/Nill Bill इत्यादी पर्यायांपैकी **Electronic** या पर्यायाअंतर्गत 'e-Kuber' हा पर्याय निवडावा.

४. लेखापरिक्षण शाखेने पारित केलेली देयके पर्यवेक्षक, धनादेश शाखा (चेक सुपरवायजर) यांच्या लॉगीनला प्रदानाची पडताळणी (व्हेरीफाय) करण्यासाठी प्रणालीमध्ये तसेच प्रत्यक्षात उपलब्ध होतील.

५. पर्यवेक्षक धनादेश शाखा यांनी पडताळणी केलेली देयके सहाय्यक अधिदान व लेखा अधिकारी/अप्पर कोषागार अधिकारी, धनादेश शाखा यांच्या लॉगीनला उपलब्ध होतील.

६. सहाय्यक अधिदान व लेखा अधिकारी/अप्पर कोषागार अधिकारी, धनादेश शाखा यांचेकडून प्रदान संमत झालेल्या देयकांचा प्रदान विषयक तपशील (जसे बँकेचे नाव,खाते क्रमांक,रक्कम,IFSC इत्यादी) आहरण व संवितरण अधिकारी यांना त्याची अचूकता तपासण्यासाठी बीम्स प्रणालीवर DDO Login ला Maintainance मेनूमध्ये Approve e-kuber bill या पर्यायाखाली उपलब्ध होईल. सर्व तपशिल योग्य असल्यास आहरण व संवितरण अधिकारी यांनी प्रदानाला मंजूरी दयावी. तथापि याकरीता आहरण व संवितरण अधिकारी यांना केवळ १० दिवसांचीच मुदत उपलब्ध असेल.

७. सध्यस्थितीत कार्यरत असणारी अधिदान व लेखा कार्यालयाची ट्रेझरीनेट प्रणाली 'सेंट्रल सर्व्हर' वर स्थानांतरीत होईपर्यंत या प्रणालीद्वारे पाठविण्यात येणारी व आहरण व संवितरण अधिकाऱ्यांकडून

तपासणीअंती कोषागारास पुन्हा प्राप्त होणारी 'फाईल' कोषागारास अर्थवाहिनी प्रणालीमार्फत 'अपलोड' व 'डाऊनलोड' करावी लागेल.

८. प्रदानाच्या अनुषंगाने सर्व बाबींची तपासणी (उदा. बँकेचे नाव,खाते क्रमांक,रक्कम,IFSC इत्यादी) करुन आहरण व संवितरण अधिकारी यांच्याकडून संबंधीत देयकांची 'फाईल' सहाय्यक अधिदान व लेखा अधिकारी/अप्पर कोषागार अधिकारी, धनादेश शाखा यांना प्रदानासाठी प्राप्त होईल. त्यांनी प्रदानास मान्यता दिल्यानंतर अशा देयकांना प्रणालीमार्फत प्रमाणक क्रमांक,दिनांक तसेच 'ॲडव्हाइस क्रमांक', दिनांक प्राप्त होईल.

९. ई-कुबेर प्रदान प्रणालीव्दारे प्रदानाकरीता पर्यवेक्षक आणि सहाय्यक अधिदान व लेखा अधिकारी/अप्पर कोषागार अधिकारी, धनादेश शाखा यांनी NEFT प्रदानासाठी वापरण्यात येणाऱ्या प्रचलित कार्यपध्दतीचा अवलंब करावा.

१०. डिजिटल स्वाक्षरीचा अवलंब करुन सहाय्यक अधिदान व लेखा अधिकारी/अप्पर कोषागार अधिकारी, धनादेश शाखा प्रदानासाठीची 'झीप फाईल' तयार करतील. सदर 'झीप फाईल' अर्थवाहीनी प्रणालीच्या माध्यमातून भारतीय रिझर्व्ह बँकेच्या 'SFTP सर्व्हर' मार्फत ई-कुबेर प्रदान प्रणालीवर पाठविली जाईल. सुरक्षितेच्या दृष्टीकोनातून ट्रेझरीनेट प्रणालीमध्ये बायोमॅट्रीक सहीत लॉगीनची सुविधा देखील उपलब्ध करुन देण्यात आली आहे.

११. भारतीय रिझर्व्ह बँकेच्या ई-कुबेर पोर्टलवर पाठविण्यात येणारी 'झीप फाईल',भारतीय रिझर्व्ह बँकेच्या सर्व्हरवर अपलोड झाल्याबाबत 'अर्थवाहीनी प्रणालीवर 'Ack Note' तसेच झालेल्या प्रदानाचा 'ट्रेझरीनेट प्रणाली' मध्ये ताळमेळ घेण्याकरीता 'Debit Note' प्राप्त होईल. 'Ack Note' व 'Debit Note' अर्थवाहीनी प्रणालीवर सात दिवसांकरीता उपलब्ध असेल.

१२. ट्रेझरीनेट प्रणाली मधून झालेल्या प्रदानाचा ताळमेळ घेण्याकरिता ई-कुबेर प्रदान प्रणालीव्दारे प्राप्त झालेल्या 'Ack Note' व 'Debit Note' फाईल्स धनादेश मेळ शाखेकडून दररोज अर्थवाहिनी प्रणाली वरून डाऊनलोड करून ट्रेझरीनेट मध्ये अपलोड करण्याची कार्यवाही करावी.

१३. अधिदान व लेखा कार्यालय/कोषागार कार्यालय यांचेकडून प्रदानांसाठी पाठविण्यात आलेली 'झीप फाईल' भारतीय रिझर्व्ह बँक यांचेकडून काही तांत्रिक कारणांमुळे (उदा. भारतीय रिझर्व्ह बँकेच्या सर्व्हरमध्ये काही तांत्रिक बिघाड, नेटवर्क वाहिनीमधील तांत्रिक बिघाड इ.) परत केली जाऊ शकते. अशा 'झीप फाईल' अर्थवाहिनी लॉगीनला 'Negative Acknowledgement Files', म्हणून उपलब्ध असतील.

१४. भारतीय रिझर्व्ह बँकेकडून काही तांत्रिक कारणांमुळे रद्द झालेल्या 'Negative Acknowledgement' च्या 'झीप फाईल' मधील प्रदानांबाबत ट्रेझरीनेट प्रणाली मध्ये ' Re-generate' या पर्यायाद्वारे पुन्हा प्रदानाची कार्यवाही करता येईल.

१५. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या बँक खात्यातील बदलामुळे काही प्रदाने शासनाच्या बँक खाती खर्ची पडल्यानंतर परत येण्याची शक्यता आहे. ( उदा. बँक खाते क्रमांक चुकीचा असणे, 'IFSC' चुकीचा असणे, अदात्याच्या नावांत बदल इ.) अशी प्रदाने अर्थवाहीनी प्रणालीवर 'e-kuber return notification' या पर्यायामधून 'डाऊनलोड' करुन ट्रेझरीनेट प्रणालीवर अशी प्रदाने 'अपलोड' करावीत. परत आलेल्या व्यवहारांचे लेखांकन प्रचलित पध्दतीनुसार मुख्य लेखाशिर्ष ८६७० खाली करावे.

१६. अधिदान व लेखा कार्यालय/कोषागार कार्यालय यांचेकडून नियमितपणे ई-कुबेर प्रदान प्रणालीमार्फत होणाऱ्या सर्व दैनिक प्रदानाचा तपशीलवार लेखापट (डेली पेमेंट स्क्रोल) भारतीय रिझर्व बँकेमार्फत अधिदान व लेखा कार्यालयास/कोषागार कार्यालयास प्राप्त होईल. सदर दैनिक प्रदानाच्या लेखापटाची मुद्रीत प्रत काढून जतन करुन ठेवण्यात यावी.

१७. ई-कुबेर प्रदान प्रणालीमार्फत होणाऱ्या सर्व प्रदानांचा प्रचलित कार्यपध्दतीनुसार ताळमेळ घेण्याची जबाबदारी 'धनादेश मेळ' शाखेची राहील.

१८. परिच्छेद क्र. १५ ला अनुसरून ई-कुबेर प्रणालीमार्फत प्रदान न झालेले व्यवहार म.को.नि. १९६८ मधील नियम १७० नुसार ९० दिवसांपर्यंत वैध राहतील व त्यानंतर प्रचलित कार्यपध्दतीनुसार व्यपगत होईल. त्यास कोषागारामार्फत मा. महालेखापाल कार्यालयाची मान्यता घ्यावी,तद्नंतर व्यपगत धनादेशाची कार्यपध्दती वापरुन आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना देयक पुन्हा कोषागारात सादर करण्यास कळवावे. तथापि अधिदान व लेखा कार्यालयाच्या बाबतीत अशा प्रदानाबाबत व्यपगत धनादेशाची प्रचलित कार्यपध्दती वापरुन आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना देयक अधिदान व लेखा कार्यालयात सादर करता येईल.